**मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना मंत्रालय प्रवेशपास देण्याकरिता Sumeet Facilities Ltd व्दारे राबविण्यात येत असलेल्या वरील VPMS प्रणालीमधील आवश्यक सुधारणा व सदर प्रणाली विकसित करण्याकरिता येणा-या खर्चास तसेच सदर कंपनीच्या कंत्राटास करारात नमूद अटी व शर्तीवर ३ वर्षांकरिता मुदतवाढ देणेबाबत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक : निविदा-०५१७/ प्र.क्र.१३५/विशा-४.**

दुसरा मजला,मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुख्य इमारत, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४ जानेवारी, २०२०.

वाचा:- १. गृह विभाग, शासन निर्णय क्र.निविदा-०५१७/प्र.क्र.१३५/विशा-४, दिनांक २८ मे, २०१९.
२. शासन निर्णय क्रमांक : पीईएस ०४१७/ प्र.क्र.१३७/विशा-४, दिनांक ०१ जुलै, २०१९.
३. गृह विभाग, शासन निर्णय क्र.निविदा-०५१७/प्र.क्र.१३५/विशा-४, दिनांक ०६ जुलै, २०१९.
४. शासन निर्णय क्रमांक : पीईएस ०४१७/ प्र.क्र.१३७/विशा-४, दिनांक २२ जुलै, २०१९.
५. गृह विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र.निविदा - ०५१७/प्र.क्र.१३५/विशा-४, दि.०९ ऑगस्ट, २०१९.
६. मे.सुमित फॅसिलिटिल, पुणे कंपनीचे दिनांक १३.१२.२०१९ चे पत्र.

प्रस्तावना :-

मंत्रालयात येणा-या अभ्यांगतांना व्हिजिटर पास मॅनेजमेंट सिस्टिम (VPMS) प्रणालीव्दारे ऑनलाईन प्रवेशपास देण्याकरिता महा-ऑनलाईन लि. या कंपनीचे कंत्राट दिनांक १५ जुलै, २०१९ रोजी संपुष्टात येत असल्याने आता मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना VPMS प्रणालीव्दारे प्रवेशपास देण्याकरिता सॉफटवेअर व १४ मनुष्यबळ पुरविण्याकरिता on line e-tendering ची प्रक्रिया राबविण्यात आली. त्यानुसार, दिनांक २४ जून, २०१९ रोजी तांत्रिक निविदा (Technical Bid) उघडण्यात आल्या. त्यावेळी एकूण ११ निविदा प्राप्त झाल्याचे निदर्शनास आले. यापैकी फक्त २ निविदा तांत्रिकदृष्टया पात्र असल्याचे सिध्द झाले. त्यानुसार, दिनांक २८ जून, २०१९ रोजी आर्थिक निविदा (Financial Bid) उघडण्यात आल्या. यामध्ये Sumeet Facilities Ltd. यांनी सदर प्रणाली राबविण्याकरिता कमी किमतीची निविदा भरलेली असल्याने, त्यांची सदर प्रणाली राबविण्याकरिता निवड करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना VPMS प्रणालीव्दारे मंत्रालय प्रवेशपत्रिका देण्याकरिता On-line e-tendering व्दारे मे.सुमित फॅसिलिटिज लि., पुणे यांना दिनांक १६.०८.२०१९ ते १५.०८.२०२० या कालावधीकरिता सॉफ्टवेअर व १४ मनुष्यबळ पुरविण्याकरिता शासन निर्णय दिनांक ०६ जुलै, २०१९ अन्वये कंत्राट देण्यात आले आहे. सदर बाबीसाठी होणा-या खर्चाकरिता शासन निर्णय दिनांक २८ मे, २०१९ अन्वये अंदाजित वार्षिक खर्चास यापूर्वीच प्रशासकीय मान्यता घेण्यात आली आहे. सदरहू

निविदेप्रमाणे VPMS प्रणालीसाठी आवश्यक सॉफ्टवेअर सदर कंपनी विनामूल्य पुरविणार आहे तसेच १४ मनुष्यबळ पुरविण्याकरिता प्रतिमाह रु.२,४१,७७०/- इतका खर्च येणार आहे.

दरम्यानच्या कालावधीत मे.सुमित फॅसिलिटिज लि., पुणे यांचे प्रतिनिधी यांनी त्यांच्या दिनांक १३.१२.२०१९ च्या पत्रान्वये सदर प्रणालीसाठी वापरण्यात येणा-या सॉफ्टवेअरचे माहिती व तंत्रज्ञान विभागाने नेमून दिलेल्या एजन्सीकडून सेक्युरिटी ऑडिट करण्यासाठी लागलेला रु.४०,०००/- ठोक खर्चाची प्रतिपूर्ती करण्याची विनंती केली आहे. तसेच या VPMS प्रणालीसाठी क्लाउड प्रणालीचा वापर करण्यासाठी सर्वरचे भाडयाचा अतिरिक्त खर्च मिळण्याबाबतही विनंती केली आहे. (सदर खर्च हा त्या-त्या महिन्यांत प्राप्त होणा-या देयकानुसार अदा करण्यात येईल.) त्यानुसार सिक्युरिटी ऑडिटची प्रक्रिया पूर्ण करुन मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना VPMS प्रणालीव्दारे मंत्रालय प्रवेशपास देण्याचे काम दिनांक १६.०८.२०१९ पासून प्रत्यक्ष सुरु करण्यात आले आहे.

२. प्रत्यक्षात काम सुरु झाल्यानंतर मा.मुख्य सचिव यांनी मंत्रालय गेटवर भेट देऊन कामकाजाचा प्रत्यक्ष आढावा घेतला व त्याअनुषंगाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २५.०९.२०१९ तसेच दिनांक १९.१०.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत त्यांनी दिलेल्या निर्देशानुसार सदर प्रणालीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करणेबाबत व सदर प्रणाली विकसित करण्याबाबत कंपनीला सूचना देण्यात आल्या होत्या. त्याअनुषंगाने सध्या अस्तित्त्वात असलेल्या प्रवेश खिडक्या व मनुष्यबळात ४ अतिरिक्त खिडक्या व मनुष्यबळ वाढविण्यात याव्यात.तसेच मा.मुख्यमंत्री/ मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री /मा.मुख्य सचिव व विभागीय सचिव यांच्याकडे येणा-या अभ्यागतांसाठी Online प्रवेशपास प्रणाली विकसित करण्याबाबत मे.सुमित फॅसिलिटिज लि., पुणे या कंपनीस सूचना देण्यात आल्या होत्या. त्याअनुषंगाने सदर प्रणालीमध्ये आवश्यक सुधारणा व विकसित प्रणालीसाठी लागणा-या आवश्यक वाढीव खर्चास मंजूरी देण्याबाबत उपरोक्त पत्रान्वये विनंती करण्यात आली होती.

त्याअनुषंगाने खालील प्रस्तावास शासन स्तरावरुन मंजूरी प्रदान करण्यात आली आहे.

१. सध्या अस्तित्त्वात असलेल्या प्रवेश खिडक्या व मनुष्यबळात ४ अतिरिक्त खिडक्या व मनुष्यबळ वाढविण्यात याव्यात.

२. मा.मुख्यमंत्री/ मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री /मा.मुख्य सचिव व विभागीय सचिव यांच्याकडे येणा-या अभ्यागतांसाठी Online प्रवेशपास प्रणाली विकसित करण्यासाठी प्रतिमाह रु.१५,०००/- व सदरहू प्रणालीसाठी अतिरिक्त मनुष्यबळ बॅकहन्ड सपोर्ट सर्वर मेन्टनन्ससाठी प्रति लॉगइन (अंदाजित १०० लॉगइन) प्रतिमाह रु.५०००/- इतक्या खर्चास मान्यता देण्यात यावी.

३. तसेच सदर प्रणाली राबविण्यासाठी लागणारे करण्यात आलेला व प्रणाली विकसित केल्यानंतर सदर प्रणालीचे कार्यान्वयन करण्यासाठी लागणरे पर्यवेक्षक, व्यवस्थापक यांच्या खर्चासाठी अतिरिक्त वाढीव खर्चाच्या १०% (GST वगळून) इतक्या खर्चास मंजूरी देण्यात यावी.

तसेच, सदर प्रणाली मध्ये केलेल्या आवश्यक सुधारणा व विकसित केलेल्या प्रणालीची बाब विचारात घेता, याच अटी व शर्तींवर सदर VPMS प्रणाली राबविण्यासाठी ३ वर्षेकरिता मुदतवाढ मिळावी, अशी विनंती उपरोक्त पत्रान्वये करण्यात आली होती. त्याअनुषंगाने मे.सुमित फॅसिलिटिज लि. पुणे यांना सदर प्रणालीमध्ये करण्यात आलेल्या आवश्यक सुधारणा व सदर प्रणाली विकसित करण्यासाठी आलेल्या वाढीव खर्चास तसेच सदर करारात असलेल्या अटी व शर्तींवर सदर VPMS प्रणाली राबविण्यासाठी ३ वर्षाकरिता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णयः-**

मंत्रालयात येणा-या अभ्यागतांना मंत्रालय प्रवेशपास देण्याकरिता Sumeet Facilities Ltd व्दारे राबविण्यात येत असलेल्या वरील VPMS प्रणालीमधील आवश्यक सुधारणा व सदर प्रणाली विकसित करण्याकरिता येणा-या खर्चास तसेच सदर कंपनीच्या कंत्राटास करारात नमूद अटी व शर्तीवर ३ वर्षाकरिता (कालावधी:- दिनांक १६.०८.२०१९ ते दिनांक १५.०८.२०२२) मुदतवाढ देणेबाबत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच सदर बाबीसाठी होणा-या खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे लागणा-या रु.८८,०९,५७२/- (रुपये अठ्ठाऐंशी लक्ष नव हजार पाचशे बहात्तर फक्त) इतक्या वार्षिक रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | एकूण पदे | मानधनाचा दर | मासिक मानधन | मासिक कर (९% CGST व ९% SGST) | एकूण मासिक मानधन | एकूण वार्षिक मानधन |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | अतिरिक्त ४ डाटा एन्ट्री ऑपरेटर | ४ | रु.१४६३५/- (प्रति कर्मचारी प्रती माह) | रु.५८,५४०/- | रु.१०,५३७/- | रु.६९,०७७/- | रु.८,२८,९२४/- |
| ब | सॉफ्टवेअर विकसित करण्यासाठीचा खर्च | -- | रु.१५,०००/- (प्रति माह) | रु.१५,०००/- | रु.२,७००/- | रु.१७,७००/- | रु.२,१२,४००/- |
| क | सॉफ्टवेअर कार्यान्वयन आणि देखभाल खर्च *(प्रत्यक्ष कार्यान्वित करण्याच्या दिनांकापासून) | १०० लॉगइन (अंदाजित) | रु.५०००/- (प्रति लॉगइन) | रु.५,००,०००/- | रु.९०,०००/- | रु.५,९०,०००/- | रु.७०,८०,०००/- |
| एकूण (अ+ ब+ क) | | | | रु.५,७३,५४०/- | रु.१,०३,२३७/- | रु.६,७६,७७७/- | रु.८१,२१,३२४/- |
| ४ | पर्यवेक्षक, व्यवस्थापक यांच्या खर्चासाठी अतिरिक्त वाढीव खर्चाच्या १०% खर्च (CGST व SGST वगळून) | -- | -- | | -- | -- | रु.६,८८,२४८/- |
| मूळ एकूण | | | | | | | रु.८८,०९,५७२/- |

३. सदर बाबीवर होणारा खर्च गृह विभाग मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५००९७) ५०-इतर खर्च- दत्तमत या लेखाशीर्षाखाली त्या-त्या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. याकरिता पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण प्राधिकारी म्हणून आणि त्यांच्या कार्यालयातील वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. Sumeet Facilities Ltd. या कंपनीसोबत नियमानुसार करार करण्यात आला आहे. सदर कराराच्या अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता त्यांना घ्यावी लागेल. अटी व शर्तींचा भंग झाल्यास, सदर कंत्राट रद्द करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००१०८१५०४२५३३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Babasaheb Sadashiv Khandare
Date: 2020.01.08 14:49:11 +05'30'

**( बाबासाहेब स. खंदारे )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
३) पोलीस उपायुक्त, मंत्रालय सुरक्षा, मंत्रालय, मुंबई
४) सुमित फॅसिलिटिज लि., सुमित हाऊस, २ रा मजला, प्लॉट नं.६४/२१, डी-II, एम.आय.डी.सी., चिंचवड, पुणे-४११ ०१९.
५) महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती- विशा-४, गृह विभाग.